**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः एबावि 2009 /प्र.क्र. 135/का-5
मंत्रालय, मुंबई - 400 032
दिनांक :- **5. जानेवारी 2010**

**पार्श्वभुमी :-** एकात्मिक बाल विकास सेवा ही केंद्र पुरस्कृत योजना ग्रामीण, आदिवासी तसेच नागरी भागात राबविण्यात येत आहे. या योजनेअंतर्गत 6 वर्षाखालील बालके, गर्भवती महिला, स्तनदा माता आणि किशोरवयीन मुली यांना पुरक पोषण आहार, अनौपचारिक शिक्षण, लसीकरण, आरोग्य तपासणी आणि संदर्भ सेवा पुरविण्यात येतात शिवाय 6 वर्षा खालील बालकांचा पोषण व आरोग्य विषयक दर्जा सुधारणे, मुलांच्या योग्य मानसिक, शारिरीक व सामाजिक विकासाचा पाया घालणे, बालमृत्यूचे आणि कुपोषणाचे प्रमाण कमी करणे, बाल विकासास चालना मिळावी म्हणून विविध विभागामध्ये धोरण व अंमलबजावणी याबाबत परिणामकारक समन्वय साधणे, योग्य अशा पोषण व आरोग्य विषयक शिक्षणाद्वारे बालकांचे सर्वसामान्य आरोग्य व त्यांच्या पोषण विषयक गरजांकडे लक्ष पुरविण्याविषयीची मातांची क्षमता वाढविणे, इ. या योजनेची उद्दिष्टये आहेत.

वरील सेवा अंगणवाडी केंद्र / प्राथमिक आरोग्य केंद्र स्तरावर एकात्मिक बाल विकास सेवा योजना आणि आरोग्य विभागाद्वारा दिल्या जातात. एकात्मिक बाल विकास सेवा अंतर्गत राज्यातील अंगणवाडी कार्यकर्ती आणि मदतनीस यांच्या सहाय्याने पूरक पोषण आहार, अनौपचारिक शिक्षण, लसीकरण स्तनदा माता, गरोदर स्त्रिया आणि किशोरवयीन मुलींचे सक्षमीकरण करणे इत्यादी महत्वाची कामे केली जातात. अंगणवाडी सेविका आणि मदतनीस यांचेवर पर्यवेक्षकीय नियंत्रण ठेवण्याची आणि संनियंत्रणाची प्राथमिक आणि महत्वपूर्ण जबाबदारी एकात्मिक बाल विकास सेवा योजनेत काम करणाऱ्या पर्यवेक्षीकांवर सोपवण्यात आली आहे. या योजने अंतर्गत पर्यवेक्षीकांना नियत करून दिलेल्या कामात सुसूत्रता असावी तसेच दिलेल्या कामाची उद्दिष्टये प्रभावीपणे साध्य करून योजनेची अंमलबजावणी परिणामकारकपणे करता यावी यासाठी पर्यवेक्षीकाच्या कामांचे / जबाबदाऱ्यांचे सुसूत्रीकरण करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय**:- एकात्मिक बाल विकास सेवा योजनेत काम करणाऱ्या पर्यवेक्षीकांच्या कामात सुत्रबध्दता असावी, त्यांना दिलेली कामे, उद्दिष्टये अधिक परिणामकारकपणे त्यांना पार पाडता यावीत आणि बाल आरोग्य आणि विकासाच्या या महत्वपूर्ण योजनेची अंमलबजावणी जास्त प्रभावीपणे करता यावी यासाठी पर्यवेक्षीकांवर **परिशिष्ट-'अ'** मध्ये दर्शविलेली कामे / जबाबदाऱ्या या शासन निर्णयाद्वारे सोपवण्यात येत आहेत. **परिशिष्ट-' ब'** मध्ये दिलेल्या मुद्यांवर तिच्या कामाचे मुल्यमापन करण्यात यावे.

2. वरील सर्व मुद्दयांच्या अनुषंगाने पर्यवेक्षिकांच्या कामाचे मूल्यमापन करण्यांसाठी राज्य / विभाग / जिल्हापातळीवरील प्रशासनामार्फत पडताळणी (Cross Checking) व्हावी. अशा प्रकारचे मुल्यमापन करण्यांसाठी प्रामुख्याने "परिशिष्ट-ब" मध्ये दिलेल्या विषयांच्या अनुषंगाने मुल्यमापन करावे. ज्या पर्यवेक्षिकेच्या क्षेत्रातील कामाचा दर्जा उत्कृष्ट असेल, अशा पर्यवेक्षिकेच्या कामाची नोंद त्यांच्या गोपनिय अहवालात घ्यावी आणि पात्रतेनुसार आगावू वेतनवाढीसाठी प्राधान्याने विचार व्हावा. उत्कृष्ट काम करणाऱ्या पर्यवेक्षिकांचा उत्साह वृध्दींगत होण्यासाठी आढावा बैठकांत / पं.रा.सं. समित्यामध्ये / विशेष समारंभात प्रशस्तीपत्र / सन्मानपत्र देवून गुणगौरव करावा.ज्या पर्यवेक्षिकांनी त्यांच्या कर्तव्यात कसुर केली असेल असे निदर्शनास आल्यास त्यांच्यावर कठोर प्रशासकिय कार्यवाही करावी.

3. राज्यातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याकरीता एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत असलेल्या पर्यवेक्षिकांचे कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या वरीलप्रमाणे विषद करण्यात आलेल्या आहेत.

बाल विकास प्रकल्प अधिकारी ,उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बा.वि.), मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प. आणि आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी वरील शासन निर्णयाची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(ज.कि.मगरे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई
७. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल, आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद.
९. सचिव व आयुक्त, आरोग्य व कुटूंब कल्याण विभाग मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा, नवी मुंबई.
१६. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
17. कुलगूरु, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, दिंडोरी रोड, नाशिक.
१८. राज्यसमन्वयक (पी.पी.एम.यु.) , महिला व बाल विकास मंत्रालय, मुंबई
१९. विभागीय आयुक्त (सर्व)
२०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई
२१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२२. संचालक, राष्ट्रीय ग्राम आरोग्य मिशन, आरोग्य भवन, मुंबई.
२३. अधिष्ठाता, सर्व वैद्यकीय महाविद्यालय (शासकीय/खाजगी)
२४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण भवन, पुणे.
२५. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
२६. जिल्हाधिकारी (सर्व)
२७. उप संचालक ,आरोग्य सेवा, प्रादेशीक मंडळ (सर्व)
२८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
२९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३०. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल विकास), जिल्हा परिषद (सर्व)
३१. जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
३२. मुख्याधिकारी, नगरपालिका व नगर परिषद.
३३. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी /ग्रामीण आदिवासी प्रकल्प)(आयुक्त, एबाविसेयो, नवी मुंबई यांचे मार्फत)
३४. सर्व पर्यवेक्षिका / मुख्य सेविका,( बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी /ग्रामीण आदिवासी प्रकल्प) यांचे मार्फत)
३५. अवर सचिव (का-७) / कक्ष अधिकारी (का-६), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३६. ( कार्यासन ०५ ) निवड नस्ती.

(शा.नि. क्र. एबावि 2009/प्र.क्र.135/का.05 दि. 5 जानेवारी, 2010 चे सहपत्र)

## परिशिष्ट - 'अ'

### एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत मुख्य सेविका / पर्यवेक्षिकांच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या.

1. पर्यवेक्षिकांचे मुख्यालय त्यांचे बीट स्तरावर असेल. पर्यवेक्षिकांना मुख्यालयी निवासी राहणे बंधन कारक राहील. प्रवास देयके बीट मुख्यालय ते प्रवासित ठिकाण आणि परत बीट मुख्यालय या प्रमाणे अनुज्ञेय असतील. पर्यवेक्षिकांनी त्यांचा पुढील महिन्याचा संभाव्य फिरतीचा कार्यक्रम चालु महिन्याच्या 20 तारखेपर्यंत आणि मासिक दैनंदिनी प्रत्येक महिन्याच्या 10 तारखेपर्यंत प्रकल्प कार्यालयाकडे सादर करावा.

2. पर्यवेक्षिका या त्यांच्या अधिनस्त काम करणाऱ्या सर्व अंगणवाडी कार्यकर्ती आणि मदतनीस त्यांच्या मुख्यालयी राहतात याची वेळोवेळी खात्री करतील व ज्या अंगणवाडी कार्यकर्ती आणि मदतनीस मुख्यालयी राहत नाहीत त्यांच्या विरुध्द कार्यवाही प्रस्तावित करतील.

3. पर्यवेक्षिका या त्यांच्या बीट अंर्तगत काम करणाऱ्या सर्व अंगणवाडी कार्यकर्ती आणि मदतनीस याचेवर पर्यवेक्षकीय नियत्रंण ठेवतील.

4. पर्यवेक्षिकांना बीट कार्यक्षेत्राबाहेर परंतु प्रकल्पात प्रवास करावयाचा असल्यास बाल विकास प्रकल्प अधिकारी यांची पूर्वानुमती घेतील. प्रकल्पाबाहेर परंतु जिल्हयात प्रवास करण्यासाठी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बा.वि) यांची पूर्वानुमती घेतील.

5. पर्यवेक्षिकां त्यांच्या बीट क्षेत्रातील सर्व अंगणवाडयानां **प्रत्येक महिन्यात किमान एकदा भेट** देतील. बीट मध्ये असलेल्या एकूण अंगणवाडया पैकी काही अंगणवाडयाच्या भेटी बाल विकास प्रकल्प अधिकाऱ्यासोबत करतील. तसेच दरमहा किमान 33% अंगणवाड्यांची सर्व नोंदवह्यासह संपूर्ण तपासणी करुन **तीन महिन्यात बीटमधील सर्व अंगणवाडी केंद्राची तपासणी** पूर्ण करुन सहाय्यभूत पर्यवेक्षण करतील.

6. प्राथमिक आरोग्य केंद्रास आवश्यकतेप्रमाणे भेट देवून आरोग्याच्या समस्या असलेल्या सर्व गंभीर तिव्र कुपोषीत (SAM) आणि गंभीर व दुर्धर बालकांच्या श्रेणी सुधार/उपचारा बाबत वैद्यकीय अधिकाऱ्यासोबत चर्चा / नियोजन करतील. गरजेनुसार संदर्भ सेवेसाठी संयुक्त अहवाल बाल विकास प्रकल्प अधिकारी आणि तालूका आरोग्य अधिकाऱ्याकडे सादर करतील.

7. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना आणि मुख्य कार्यकारी आधिकारी जिल्हा परिषद यांनी अंगणवाडी कार्यकर्तीना वेळोवेळी नियत करुन दिलेली सर्व कामे पुर्ण करून घेण्यासाठी पर्यवेक्षिका जबाबदार असतील.

8. पर्यवेक्षिका दरमहा अंगणवाडी कार्यकर्तीच्या मासिक बैठका प्राथमिक आरोग्य केंद्र स्तरावर वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या उपस्थितीत घेतील. या बैठकीत एकात्मिक बाल विकास सेवा योजनांच्या सर्व कामाच्या आढाव्यासह आरोग्य विभागाच्या समन्वयाने करावयाच्या कामाचा आढावा घेतील. याच बैठकीत प्रत्येक महिन्यात अंगणवाडी कार्यकर्तीच्या उद्‌बोधनासाठी आहार व आरोग्याच्या

एका विषयावर प्रशिक्षण देतील. अंगणवाडी सेविका / मदतनिस यांना कोणत्या विषयाचे प्रशिक्षण देण्यात आले आहे आणि कोणत्या विषयाचे प्रशिक्षण आवश्यक आहे याची माहिती ठेवतील (Training Need Assessment ). ज्या प्रशिक्षीत अंगणवाडी सेविका / मदतनीस यांना पुन्हा प्रशिक्षणाची गरज आहे अशा अंगणवाडी सेविका/ मदतनीस यांना पुनर्प्रशिक्षणासाठी वरीष्ठांकडे शिफारस करतील. अप्रशिक्षित अंगणवाडी सेविका / मदतनीस यांना प्राधान्यांने प्रशिक्षणाला पाठविण्यासाठी पाठपूरावा करतील.

9. पर्यवेक्षिका हया त्यांचे बीट अर्तंगत प्रत्येक अंगणवाडी क्षेत्रात दर तिमाहीत केले जाणारे सर्वेक्षणाचे काम 100% पूर्ण केले जाईल यांची दक्षता घेतील. अंगणवाडी क्षेत्राअर्तंगत सर्व वाडी, वस्ती, तांडे यातील एकही कुटूंब आणि बालक सर्वेक्षणातून सुटणार नाही यांची त्या दक्षता घेतील. अतिरिक्त लोकसंख्येसाठी प्रचलीत निकषाप्रमाणे नविन अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्राची मागणी नोंदवण्याची प्रमुख जबाबदारी पर्यवेक्षीकांची असेल.

10. अंगणवाडी कार्यकर्तीकडून सर्वेक्षणाचे काम परीपुर्ण आणि अचुक होईल यासाठी वेळोवेळी पर्यवेक्षिका मार्गदर्शन करतील आणि मागील आकडेवारीच्या तुलनेत लक्षणीय तफावत आढळल्यास त्याची कारणमिमांसा करुन त्याची नोंद ठेवतील.

11. बीटस्तरावरील सर्व अंगणवाडी केंद्रात बालकांची वजनमापन क्षमता दरमहा 100% राहील याची दक्षता घेतील आणि मागील आकडेवारीच्या तुलनेत लक्षणीय तफावत आढळल्यास त्याचीसुध्दा कारणमिमांसा करुन त्याची नोंद ठेवतील.

12. अंगणवाडीकेंद्राच्या भेटीत आणि तपासणीत पर्यवेक्षिका सर्वेक्षण आणि वजनमापनक्षमता योग्य आणि अचूक असल्याबाबत सातत्याने खात्री करतील. वरिष्ठपातळीवरुन सर्वेक्षण आणि वजनक्षमतेबाबत पडताळणी (cross checking) मध्ये मोठया प्रमाणावर तफावत आढळल्यास पर्यवेक्षिका जबाबदार असतील.

13. पर्यवेक्षिका 6 वर्षाखालील सर्व बालकांचे वयानुसार वजन (Underweight ) या निकषाधारे प्रत्येक अंगणवाडी स्तरावर अचुक श्रेणी वर्गीकरण करण्यात आले आहे याची त्यांच्या भेटीत आणि तपासणीत खात्री करतील. अंगणवाडी केंद्रस्तरावरील श्रेणी वर्गीकरण नोंदवही आणि वृध्दीसंनियंत्रण आलेखपुस्तिका तसेच मासिक अहवाल यामध्ये तफावत येणार नाही याची दक्षता घेतील. अंगणवाडी कार्यकर्तीने दिलेला अहवाल आणि पर्यवेक्षिकेने प्रकल्पकार्यालयास सादर केलेल्या अहवालात तफावत आढळून आल्यास पर्यवेक्षिका जबाबदार असतील.

14. **वयानुसार वजन** या निकषाआधारे **कमी वजनाच्या आणि तिव्र कमी वजनांच्या** मुलांवर लक्ष केंद्रीत करून त्यांना अंगणवाडी सेविकेमार्फत साधारण (Normal) श्रेणीत आणण्यासाठी प्रयत्नशील राहतील. 0-3 वर्षे वयोगटातील बालकांवर विशेष लक्ष देऊन या वयोगटातील बालकांच्या उंची आणि वजन वाढीवर लक्ष केंद्रीत करतील. बाल आहार, आरोग्य व संगोपन या बाबीत पालकांना सक्षम करण्यासाठी आहार प्रात्यक्षीके, प्रशिक्षण आणि आरोग्य शिक्षणावर भर देवून बालकांचे श्रेणीवर्धन करण्यासाठी प्रयत्न करतील.

15. पर्यवेक्षिका अंगणवाडीची तपासणी, मातांच्या बैठका, आहार प्रात्यक्षिके आणि बालकांचे वृध्दीसंनियंत्रण - सामाजिक लेखा परिक्षण शक्यतो एकाच दिवशी करण्याचे नियोजन करतील.

सामाजिक लेखा परिक्षणात अंगणवाडी सेविकेचे आणि मातांचे प्रश्नोत्तराद्वारे कुपोषण कमी करण्यासाठी आणि बालकांतील व्यंग टाळण्यासाठी घ्यावयाची काळजी यासंदर्भात सक्षमीकरण करतील.

16. ग्रामसभेत /महिला-ग्रामसभेत उपस्थित राहुन कुपोषण कमी करण्यासाठी आणि महिलांच्या आहार व आरोग्य समस्याविषयी मार्गदर्शन करतील.

17. पर्यवेक्षिका जागतिक आरोग्य संघटनेच्या नविन मापदंडाप्रमाणे लुकड्या आणि बुटक्या (Wasting and Stunting) बालकांचा शोध घेण्यासाठी तीन महिन्यातून एकदा कमी वजनाच्या (<-2SD) आणि तीव्र कमी वजनाच्या (<-3SD) बालकांची लांबी / उंची आणि वजन घेतील आणि त्याअनूषंगाने वर्गीकरण करुन त्याच्या नोंदी नोंदवहीत अंगणवाडीस्तरावर ठेवतील.

18. पर्यवेक्षिका बालकाची उंची आणि वजन घेतांना अंगणवाडी सेविकांची मदत घेतील आणि त्याना लांबी / उंची कशी घ्यावी याबाबत Hands on Training देवून पूर्णत: प्रशिक्षीत करतील. बुटक्या आणि लूकड्या बालकांच्या माता / पालकांना उंची आणि वजनाचे महत्व समजावून आहाराचे मार्गदर्शन करतील.

19. पर्यवेक्षीका SAM व MAM बालकांचा शोध घेवून त्यांना अंगणवाडी केंद्र पातळीवर ग्राम बाल विकास केंद्रात सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी नियोजन करून बालकांचे श्रेणी वर्धन करतील. अंगणवाडी सेविकेमार्फत अशा बालकांचा पाठपूरावा करुन श्रेणीवर्धन करण्याची जबाबदारी पर्यवेक्षिकेची असेल. ज्या बालकांना आरोग्याचे प्रश्न असतील अशी बालके वैद्यकीय अधिकारी प्राथमिक आरोग्य केंद्र यांच्याकडे तातडीने संदर्भीत करण्याबाबत पर्यवेक्षीका दक्षता घेतील. अशा सर्व SAM व MAM बालकांच्या नोंदी पर्यवेक्षिकांकडे बीटस्तरावर राहतील.

20. पर्यवेक्षिका सर्व अंगणवाडी केंद्राच्या दर्शनी भागावर /फलकावर अंगणवाडीची वेळ, आहाराच्या वेळा, लसीकरणाचा दिवस, माताबैठकीचा दिवस, बालकांचे वजन घेण्याचा दिवस इ. माहिती दर्शविली आहे याची खात्री करतील. सर्व अंगणवाड्याच्या वेळा अचूक पाळल्या जात आहेत याबाबत दक्षता घेतील.

21. अंगणवाडी केंद्रात येणाऱ्या सर्व बालकांना दोनवेळा आहार देण्यात येत आहे याबाबत खात्री करून अंगणवाडी सुरू होतांना पहीला आहार व अंगणवाडी सोडण्यापूर्वी दुसरा आहार असे नियोजन काटेकोरपणे पाळले जाईल यासाठी पर्यवेक्षीका दक्षता घेतील.

22. पर्यवेक्षीका हया अंगणवाडी स्तरावर आहारासाठी पात्र असलेल्या सर्व 6 महिने ते 3 वर्ष वयोगटातील बालके, तीव्र कमी वजनाची बालके, स्तनदा माता आणि गरोदर स्त्रियांना Take Home Ration (THR) दिला जातो आणि घरी आहार नेल्यानंतर त्याचा वापर लाभधारकांसाठीच केला जातो याबाबतची शहानिशा अंगणवाडी भेट / तपासणी / गृहभेट /माताबैठकीत करतील.

23. पर्यवेक्षिका, लाभधारकांच्या प्रत्यक्ष उपस्थितीच्या प्रमाणात आहार शिजविला जाईल आणि मानकाप्रमाणे लाभधारकास दोन वेळेत(शासन निर्णयाप्रमाणे) दिला जाईल याची शहानिशा करतील. लाभधारकांसाठी शिजविला जाणारा पोषण आहार अंगणवाडी केंद्रातच शिजवला जाईल आणि स्वच्छता राखली जाईल याची दक्षता घेतील.

24. पर्यवेक्षिका आहार शिजवतांना लाभार्थ्यांच्या प्रत्यक्ष उपस्थितीनुसारच हजेरीपटावर / आहार नोंदवहीत नोंदी घेतल्या आहेत याची खात्री अंगणवाडी केंद्राच्या भेटीत /तपासणीत करतील आणि तफावतीच्या नोंदी ठेवतील. आहाराची देयके प्रमाणीत करतांना आढळलेल्या तफावतीप्रमाणे देयकात आवश्यक त्या दुरुस्त्या करतील.

25. पर्यवेक्षिका, बचत गटाची /आहार पूरवठादाराची देयके अचुक आहेत याची खात्री करुन प्रमाणित करतील आणि विनाविलंब अदायीसाठी बाल विकास प्रकल्प अधिकारी यांचेकडे सादर करतील.

26. विहित केलेल्या दैनिक पाककृती प्रमाणे आहाराचा दर्जा आणि प्रमाण (उष्मांक आणि प्रथिने) योग्य असल्याची खात्री करतील. आहार पुरवठा मानकाप्रमाणे होत नसल्यास पर्यवेक्षिका वरिष्ठांकडे संबंधिताविरूध्द कार्यवाहीसाठी तक्रार सादर करतील. पर्यवेक्षीका वेळोवेळी आहाराचा दर्जा तपासणीसाठी आहाराचे, अंगणवाडी केंद्रनिहाय, नमूने प्रत्येक तिमाहीत एक वेळ शासन मान्य प्रयोगशाळेकडे पाठवून आहाराच्या गुणवत्तेबाबत खात्री करून घेतील.

27. पर्यवेक्षिका अंगणवाडी केंद्रातील लाभधारकांची वैयक्तिक स्वच्छता, केंद्राची अंतर्गत आणि परिसर स्वच्छतेसाठी प्रयत्न करतील.अंगणवाडी केंद्रात पिण्याच्या शुध्द पाण्याची उपलब्धता असेल, बालके आहार खाण्यापूर्वी साबण-पाण्याने हात धूवून कपड्याला न पुसता हात हवेत कोरडे करतील याची खात्री करतील. स्वच्छतेच्या सर्व नियमाबाबत अंगणवाडी सेविका,मदतनीस व माता सक्षम होतील यासाठी प्रयत्नशील राहतील.

28. पर्यवेक्षीका अनौपचारिक शिक्षणासाठी 3 वर्षावरील बालकांची 100% उपस्थिती राहील आणि जी बालके सातत्याने गैरहजर आहेत त्यांची उपस्थिती वाढेल यासाठी प्रयत्न करतील.

29. पर्यवेक्षिका अनौपचारिक शिक्षणाच्या उत्तम दर्जासाठी अंगणवाडी कार्यकर्तींचे सक्षमीकरण करतील. अनौपचारिक शिक्षणासाठी अंगणवाडी केंद्रामध्ये प्राणी, झाडे, फळे इत्यादीची ओळख करुन देण्यासाठी आवश्यक साधन सामुग्री, खेळणी उपलब्ध आहे याची दक्षता घेतील.

30. पर्यवेक्षिका अंगणवाडी केंद्राच्या तपासणीत सर्व साहित्याच्या नोंदी तपासून नोंदवहीनुसार साहित्य केंद्रात असल्याची खात्री करतील.

31. पर्यवेक्षीका प्रत्येक अंगणवाडी क्षेत्रातील गर्भवती महिलांची नोंदणी पहिल्या 3 महिन्याच्या आत 100 टक्के होत आहे याची खात्री करतील. गर्भावस्थेच्या काळात त्या महिलेच्या वजनात 10 ते 12 कि.ग्रॅ. वजन वाढीसाठी अंगणवाडी सेविकेमार्फत संनियंत्रण करतील.

32. पर्यवेक्षीका विशेषत: 6 महिने पूर्ण झालेल्या बालकांना वरचा आहार योग्य प्रकारे दिला जात आहे, जोखमीच्या माता, तीव्र कमी वजनाची बालके,जन्मत: कमी वजन असलेली बालके आणि GF/GD ची बालके यांना योग्य आहार आणि आरोग्य सेवा दिली जाते याची गृहभेटीत खात्री करतील.

33. पर्यवेक्षीका अंगणवाडी केंद्रातील लसीकरणचा आढावा घेतील आणि लसीकरणतून सुटलेल्या लाभधारकांचे पुढील महिन्यात लसीकरण होईल याची खात्री करतील.

34. कुपोषणाचे प्रमाण कमी करण्यांसाठी एबाविसेयो, आरोग्यविभाग, स्वयंसेवीसंस्था, ग्रामस्थ,ग्रामपंचायत, आशा,स्वयंसहाय्यता बचत गट यांच्यामध्ये समन्वय घडवून आणण्याची महत्वाची जबाबदारी पर्यवेक्षिकावर राहिल.

35. पर्यवेक्षीकांनी खालील महत्वाच्या बाबीवर लक्ष केंद्रीत करुन अंमलबजावणी करावी.

**(अ)** प्रत्येक गरोदर महिलेस शासकिय संस्थेत प्रसूतीसाठी जाण्यास प्रोत्साहीत करणे.

**(ब)** जन्मताच प्रत्येक बाळाला एक तासाच्या आत स्तनपान देणे.

**(क)** जन्मापासून किमान 6 महिने निव्वळ स्तनपान देणे.

**(ड)** 6 महिने पुर्ण झालेल्या प्रत्येक बाळाचा अर्धवार्षिक वाढदिवस अंगणवाडीत साजरा करणे.

**(इ)** सहा महिन्यानंतर किमान दोन वर्षापर्यंत पूरक आहारासह स्तनपान देणे.

अंगणवाडी केंद्राच्या भेटीत, तपासणीत, गृहभेटीत आणि माता बैठका व सामाजिक लेखा परिक्षणाच्या वेळी मातांशी / पालकांशी चर्चा करुन पर्यवेक्षिका वरील बाबींची अंमलबजावणी होईल याची खात्री करतील. वरील सर्व महत्वाच्या उपाययोजनांद्वारे कुपोषणाचे आणि बालमृत्यूचे प्रमाण कमी होणार असल्याने याबाबत प्रामुख्याने पर्यवेक्षीका जबाबदार असतील.

36. पर्यवेक्षीका प्रत्येक अंगणवाडीत जन्ममृत्यू नोंदवही ठेवली आहे व अद्यावत आणि अचूक आहे याची खात्री वेळोवेळी करतील. बालमृत्यू / माता मृत्यू झालेल्या घरी पर्यवेक्षीकांनी स्वतः भेट देतील आणि मृत्यूच्या कारणांची माहिती वरीष्ठ कार्यालयास सादर करतील.

37. पर्यवेक्षीका अंगणवाडी कडून दरमहा प्राप्त मासिक प्रगती अहवालांची सत्यता पडताळतील आणि सर्व अंगणवाडी केंद्रांची माहिती गोषवाऱ्यासह वरिष्ठांना सादर करून त्यांचेकडे अभिलेखे ठेवतील.

38. ज्या अंगणवाडी कार्यकर्ती मासिक अहवाल विलंबाने पाठवतील किंवा अचूक अहवाल पाठवणार नाहीत अशा अंगणवाडी कार्यकर्तीना समज देवून सुधारणा करतील, आवश्यक असल्यास कार्यवाहीसाठी प्रस्ताव बाल विकास प्रकल्प अधिकारी यांच्याकडे पाठवतील.

39. ज्या अंगणवाडी कार्यकर्ती आणि मदतनीस नजिकच्या काळात नियत वयोमानामुळे सेवानिवृत्त होणार आहेत त्याची सूची ठेवतील आणि त्या प्रमाणे वरिष्ठांना कळवतील.

40. पर्यवेक्षीका त्यांच्या बीट स्तरावर खालील विषयीच्या स्वतंत्र्य नोंदवहया ठेवतील आणि त्यामध्ये अंगणवाडी निहाय माहिती भरून नोंदवहया अद्यावत ठेवतील.

1. सर्वेक्षण आणि वजनमापनक्षमता, श्रेणी वर्गीकरण वयोगटानुसार गोषवारा नोंदवही.

2. वयानुसार उंची- श्रेणी वर्गीकरणाचा गोषवारा नोंदवही (Stunting-SCM/MCM)

3. उंचीनुसार वजन-श्रेणी वर्गीकरणाचा गोषवारा नोंदवही (Wasting - SAM/MAM)

4. उंचीनुसार वजनाप्रमाणे SAM बालकांची यादी.

5. गंभीर आणि दुर्धर आजारी बालकांची यादी.

6. आहार पुरवठयाबाबत हिशोबाच्या गोषवा-याची नोंदवही.

7. अंगणवाडी केंद्र भेट/ तपासणी अहवालाची नोंदवही.

8. अंगणवाडी सेविका आणि मदतनीस - प्रशिक्षण नोंदवही.

9. अंगणवाडी सेविका आणि मदतनीस - मानधन नोंदवही.

10. मासिक अहवालांची संकलीत नोंदवही.

11. ग्राम बाल विकास केंद्रात दाखल केलेली परंतु तीन महिण्याच्या पाठपुराव्याच्या कालावधी नंतर देखील श्रेणी वर्धन न झालेल्या SAM आणि MAM बालकांची नोंदवही.

**(मबावि शा.नि. क्र. एबावि 2009/प्र.क्र.135/का.05 दि. 5 जानेवारी, 2010 चे सहपत्र)**

**परिशिष्ट - 'ब'**

**एकात्मिक बाल विकास सेवा योजना पर्यवेक्षिकेच्या कामाच्या मुल्यमापनासाठी खालील मुद्दे विचारात घेवून तिच्या कामाचे मुल्यमापन करण्यात यावे.**

**1. सर्वेक्षण क्षमता :**

अ.अंगणवाडी क्षेत्रातील सर्व 0 ते 6 वर्ष बालकांची नोंदणी .
ब. अंगणवाडी क्षेत्रातील प्रत्यक्षात बालक असतांना नोंद न घेणे.
क. अंगणवाडी क्षेत्रातील प्रत्यक्षात बालक नसतांना नोंद घेणे.
ड. सर्वेक्षणातील आणि पडताळणीतील तफावत.

**2. वजनमापन क्षमता :-**

अ. सर्वेक्षित केलेल्या सर्व बालकांची अचूक वजन घेणे.
ब. वजन घेतलेल्या बालकांचे अचूक श्रेणी वर्गीकरण करणे.
क. तीव्र कमी वजनाच्या बालकांचे वजन न घेणे/चूकीची नोंद घेणे / वरच्या श्रेणीत वर्गीकरण करणे.
ड. श्रेणी वर्गीकरण नोंदवही, वृध्दि संनियत्रण आलेख नोंदवही आणि अंगणवाडी केंद्राचा मासिक प्रगती अहवालामध्ये तफावत.

**3. वयानुसार वजन (Underweight) - श्रेणी वर्गीकरण:-**

अ. साधारण वजनाच्या (Normal) बालकाचे प्रमाण.
ब. तीव्र कमी वजनाच्या (Severe Underweight) बालकाचे प्रमाण.

**4. वयानुसार उंची (Stunting) - श्रेणी वर्गीकरण:-**

अ. साधारण उंचीच्या (Normal) बालकाचे प्रमाण.
ब. तीव्र कमी उंचीच्या (Severe Chronic Stunting) बालकाचे प्रमाण
.

**5. उंचीनुसार वजन (Wasting) - श्रेणी वर्गीकरण:-**

अ. गंभीर तीव्र कुपोषित (Severe Acute Malnutrition) बालकाचे प्रमाण.
ब. मध्यम तीव्र कुपोषित (Moderate Acute Malnutrition) बालकाचे प्रमाण.

**6. पोषण आहार वाटपाचे प्रमाण व आहाराचा दर्जा :-**

अ. सर्वेक्षीत लाभधारक संख्येनुसार सर्वांना विहित प्रमाणात आणि दर्जेदार आहार.
ब. आहारासाठी प्रत्यक्ष उपस्थिती आणि आहार हजेरीपट यातील तफावत.
क. प्रत्यक्ष उपस्थिती आणि आहार देयकात दर्शविलेली उपस्थितीची तफावत.

**7. किशोरी मुली ,गरोदर स्त्रिया व स्तनदा माता :-**

अ. अंगणवाडी क्षेत्रातील किशोरी मुली ,गरोदर स्त्रिया व स्तनदा माता 100 टक्के नोंदणी , आवश्यक सल्ला व सेवा .
ब. गर्भावस्थेच्या काळात गर्भवती महिलांच्या वजनात 10 ते 12 कि.ग्रॅ. वाढीसाठी संनियंत्रण

**8. माता बैठका, आहार प्रात्यक्षिके आणि गृहभेटी :-**

अ. माता बैठका, आहार प्रात्यक्षिके आणि गृहभेटीचे नियोजन व अंमलबजावणी.
ब. माता बैठका, आहार प्रात्यक्षिके आणि गृहभेटीसाठी अंगणवाडी कार्यकर्ती चे सक्षमीकरण आणि अंमलबजावणीत सक्रिय सहभाग.

**9. बालकांच्या वृध्दि संनियंत्रणासाठी सामाजिक लेखा परिक्षण :-**

अ. प्रत्येक तिमाहीत प्रत्येक अंगणवाडी केंद्रांतर्गत सामाजिक लेखा परिक्षण करणे.

**10. अनौपचारिक शिक्षण आणि अंगणवाडीच्या वेळा आणि अभिलेखे:-**

अ. गुणवत्तायुक्त अनौपचारिक शिक्षण
ब. अंगणवाडीच्या आणि आहार वाटपाच्या वेळा
क. अंगणवाडीतील अभिलेखे अद्यावत ठेवणे.
ड. डेड स्टॉक नोंदवही अद्यावत ठेवणे व त्याप्रमाणे केंद्रात साहित्याची उपलब्धता.

**11. स्तनपान व शिशु पोषण :-**

**अ.** जन्मताच प्रत्येक बाळाला एक तासाच्या आत स्तनपान देणे.

**ब.** जन्मापासून किमान 6 महिने निव्वळ स्तनपान देणे.

**क.** 6महिने पुर्ण झालेल्या प्रत्येक बाळाला वरचा आहार सुरू करणे(अर्धवार्षिक वाढदिवस)

**ड.** सहा महिन्यानंतर किमान दोन वर्षापर्यंत पूरक आहारासह स्तनपान देणे.

**12. विशेष उपक्रम :-**

पर्यवेक्षिकांच्या पुढाकाराने त्यांच्या कार्यक्षेत्रात काही विशेष उपक्रम घेतले असल्यास त्यांची नोंद मूल्यमापनात करावी.